**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ कार्यालयातील अधीक्षक, प्रपाठक, वरिष्ठ लिपिक व ग्रंथालयीन सहायक या पदांच्या सेवाप्रवेश नियमात सुधारणा करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

शासन निर्णय क्रमांकः सासंसे-२०१२/प्र.क्र.४५/२०१२/आस्था-२,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: ११ मे, २०१६.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातील अधीक्षक, प्रपाठक, गट-ब(अराजपत्रित), वरिष्ठ लिपिक व ग्रंथालयीन सहायक, गट-क(सेवाप्रवेश) या पदांच्या दि.६ जून, १९७२ रोजी प्रसिध्द केलेले सेवाप्रवेश नियम अधिक्रमित करुन सोबतच्या अधिसूचनेत (इंग्रजी व मराठी) दर्शविल्याप्रमाणे सेवाप्रवेश नियम शासन विहित करीत आहे.

२. उपरोक्त अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या असाधारण राजपत्रात स्वतंत्ररित्या प्रसिध्द करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१६०५०६१६३७२८२०३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
Date: 2016.05.13 17:29:35 +05'30'

**(अपर्णा अ.गावडे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई.
३. मा.राज्यपाल यांचे परिवार प्रबंधक, मुंबई.
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. सर्व अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.

७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, (पत्राने).

८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.

९. सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई.

१०.सह सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

१३.व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई (पत्राने).

१४.सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

१५.मराठी भाषा विभागातील सर्व कार्यासने.

१६.निवड नस्ती.

# अधिसूचना

मराठी भाषा विभाग,
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ११ मे, २०१६.

**भारताचे संविधान**

क्रमांक :- **सासंसे-२०१२/प्र.क्र.४५/२०१२/आस्था-२** .- भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद ३०९ च्या परंतुकाद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन आणि त्याबाबतीत करण्यात आलेले सर्व विद्यमान नियम, आदेश किंवा अनुदेश यांचे अधिक्रमण करुन, महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे, महाराष्ट्र शासनाच्या, मराठी भाषा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळामधील अधीक्षक, प्रपाठक, गट-ब (अराजपत्रित), वरिष्ठ लिपिक, ग्रंथालयीन सहायक, गट-क पदांच्या सेवाप्रवेशाचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहेत, ते असे :-

**१**. या नियमांस, मराठी भाषा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातील अधीक्षक, प्रपाठक, गट-ब (अराजपत्रित), वरिष्ठ लिपिक व ग्रंथालयीन सहायक, गट-क (सेवाप्रवेश) नियम, २०१६ असे म्हणावे.

२ या नियमांमध्ये संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर,-

(क) "**मंडळ**" याचा अर्थ, मराठी भाषा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ असा आहे;

(ख) "**पदवी**" याचा अर्थ, सांविधिक विद्यापीठाची पदवी असा आहे;

(ग) "**विभाग**" याचा अर्थ, शासनाचा मराठी भाषा विभाग असा आहे;

(घ) "**पदविका**" याचा अर्थ, सांविधिक विद्यापीठाची पदविका असा आहे;

(ङ) "**उच्च माध्यमिक शालान्त प्रमाणपत्र परीक्षा**" याचा अर्थ, महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ अधिनियम, १९६५ (१९६५ चा महा.४१) अन्वये प्रस्थापित केलेल्या विभागीय मंडळाने नियंत्रित केलेली उच्च माध्यमिक शालान्त प्रमाणपत्र परीक्षा आणि यामध्ये या परीक्षेस समकक्ष म्हणून घोषित केलेल्या इतर परीक्षा अंतर्भूत आहेत.

(च) "**शासन**" याचा अर्थ, महाराष्ट्र शासन असा आहे;

(छ) "**पदव्युत्तर पदवी**" याचा अर्थ, सांविधिक विद्यापीठाची पदव्युत्तर पदवी असा आहे.

**३**. मंडळामधील **अधीक्षक** पदावरील नियुक्ती, खालील मार्गाने करण्यात येईल-

(अ) मंडळातील वरिष्ठ लिपिक हे पद धारण करणाऱ्या व या पदावर किमान तीन वर्षे नियमित सेवा पूर्ण केलेल्या आणि उप-नियम (क) मधील उपखंड (दोन) मध्ये नमूद केलेली शैक्षणिक अर्हता धारण केलेल्या व्यक्तींमधून ज्येष्ठता अधिन पात्रता या निकषावर योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीने;

किंवा

(ब) शासनाच्या कोणत्याही कार्यालयातील समकक्ष पद धारण करणाऱ्या व प्रशासकीय कामाचा किमान ३ वर्षे इतक्या कालावधीचा अनुभव असलेल्या व उप-नियम (क) मधील उपखंड (दोन) मध्ये नमूद केलेली शैक्षणिक अर्हता धारण करणाऱ्या योग्य व्यक्तीच्या बदलीने प्रतिनियुक्तीने;

किंवा

(क) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,-

(एक) ज्यांचे, वय अडतीस वर्षापेक्षा अधिक नाहीः

परंतु, अगोदरपासून शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांच्याबाबतीत कमाल वयोमर्यादा ५ वर्षेपर्यंत शिथिल करण्यात येईल;

(दोन) ज्यांनी, मराठी या विषयातील पदवी धारण केली आहेः

परंतु, मराठी विषयातील पदव्युत्तर पदवी धारण करणाऱ्या उमेदवारास प्राधान्य देण्यात येईल;

(तीन) ज्यांनी, उपखंड (दोन) मध्ये नमूद केलेली अर्हता प्राप्त केल्यानंतर शासनामधील किंवा सरकारी क्षेत्रामधील संस्था किंवा परिसंस्थामधील दुय्यम पदावरील किमान २ वर्षे इतक्या कालावधीचा अनुभव धारण केला आहे.

४. मंडळामधील **प्रपाठक** पदावरील नियुक्ती, खालील मार्गाने करण्यात येईल -

(अ) मंडळातील वरिष्ठ लिपिक हे पद धारण करणाऱ्या व या पदावर किमान तीन वर्षे नियमित सेवा पूर्ण झालेल्या व उप-नियम (क) च्या उपखंड (दोन) मध्ये नमूद केलेली अर्हता धारण करणाऱ्या योग्य व्यक्तीच्या ज्येष्ठता अधिन पात्रता या निकषावर पदोन्नतीने;

किंवा

(ब) उप-नियम (क) च्या उपखंड (दोन) मधील अर्हता व (तीन) मधील अनुभव धारण करणाऱ्या इतर शासकीय कार्यालयातील योग्य व्यक्तीच्या बदलीने प्रतिनियुक्तीने;

किंवा

(क) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,-

(एक) ज्याचे, वय अडतीस वर्षापेक्षा अधिक नाहीः

परंतु, अगोदरपासून शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांच्याबाबतीत कमाल वयोमर्यादा ५ वर्षेपर्यंत शिथिल करण्यात येईल;

(दोन) ज्यांनी, ‘मराठी’ किंवा ‘संस्कृत’ विषयातील पदव्युत्तर पदवी धारण केली आहे;

(तीन) ज्यांनी, वेगवेगळ्या अभ्यासविषयांच्या व ज्ञानशाखांच्या अंतर्गत येणाऱ्या विषयांवरील मराठी मधील संपादकीय कामाचा किंवा संशोधन कार्याचा किंवा एकत्रित किमान २ वर्षाचा प्रत्यक्ष अनुभव धारण केला आहे.

५. मंडळामधील **वरिष्ठ लिपिक** पदावरील नियुक्ती, खालील मार्गाने करण्यात येईल, -

(अ) मंडळातील लिपिक-टंकलेखक हे पद धारण करणाऱ्या व या पदावर किमान तीन वर्षे इतकी नियमित सेवा पूर्ण केलेल्या व्यक्तींमधून ज्येष्ठता अधिन पात्रता या निकषावर योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीने;

किंवा

(ब) शासकीय कार्यालयातील समकक्ष पद धारण करणाऱ्या योग्य व्यक्तीच्या बदलीने प्रतिनियुक्तीने;

किंवा

(क) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,-

(एक) ज्यांचे, वय अडतीस वर्षापेक्षा अधिक नाही:

परंतु, अगोदरपासून शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांच्याबाबतीत कमाल वयोमर्यादा ५ वर्षेपर्यंत शिथिल करण्यात येईल;

(दोन) ज्यांनी, 'मराठी' विषयातील पदवी उत्तीर्ण केली आहे:

परंतु असे की, प्रशासकीय कामाचा अनुभव असणाऱ्या उमेदवारांना प्राधान्य देण्यात येईल.

६. मंडळामधील **ग्रंथालयीन सहायक** पदावरील नियुक्ती, खालील मार्गाने करण्यात येईल-

(अ) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,-

(एक) ज्यांचे, वय अडतीस वर्षापेक्षा अधिक नाही:

परंतु, अगोदरपासून शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांच्याबाबतीत कमाल वयोमर्यादा ५ वर्षेपर्यंत शिथिल करण्यात येईल;

(दोन) ज्यांनी, उच्च माध्यमिक शालान्त प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण केली आहे:

परंतु असे की, मराठी विषयातील पदवी धारण करणाऱ्या उमेदवारास प्राधान्य देण्यात येईल;

(तीन) ज्यांनी, ग्रंथालय शास्त्र या विषयातील पदविका किंवा पदवी धारण केली आहे.

७. नियम ३ व ४ मध्ये नमूद केलेल्या पदावर प्राधान्याने पदोन्नतीने नियुक्ती करण्यात येईल. तथापि, पदोन्नतीसाठी योग्य व पात्र व्यक्ती उपलब्ध न झाल्यास नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात येईल.

८. नियम ५ मध्ये नमूद केलेल्या पदावर पदोन्नतीने व नामनिर्देशनाने नियुक्ती अनुक्रमे ५०:५० या प्रमाणात करण्यात येईल.

९. नियम ३, ४, ५ व ६ मध्ये नमूद केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीस, शासन वेळोवेळी विहित करेल असे प्रशिक्षण यशस्वीरित्या पूर्ण करणे आवश्यक राहील.

**१०.** नियम ३, ४, ५ व ६ मध्ये नमूद केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीने, त्याबाबतीत केलेल्या नियमानुसार मराठी व हिंदी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केलेली नसेल किंवा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळालेली नसेल तर, त्याला सदर परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

**११.** नियम ३, ४, ५ व ६ मध्ये नमूद केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीने, महाराष्ट्र शासनाच्या माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाकडून वेळोवेळी विहित केलेले "संगणक हाताळणीबाबतचे प्रमाणपत्र" धारण करणे आवश्यक राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Aparna Arvind Gawde
Digitally signed by Aparna Arvind Gawde
Date: 2016.05.13 17:28:23 +05'30'

**(अपर्णा अ. गावडे)**
**शासनाचे उप सचिव**

# NOTIFICATION

Marathi Language Department,
Madam Cama Marg,
Hutatma Rajguru Chowk,
Mantralaya, Mumbai 400 032.
Dated the 11th May, 2016.

Constitution of India.

No.LCR-2012/C.R.45/2012/Astha-2.- In exercise of the powers conferred by the proviso to article 309 of the Constitution of India and in supersession of all existing rules, orders or instruments made in this behalf, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules regulating recruitment to the post of Superintendent, Reader, Group-B (Non-Gazetted), Senior Clerk, Library Assistant, Group-C in the State Board of Literature and Culture under the administrative control of the Marathi Language Department of the Government of Maharashtra, namely : -

1. These rules may be called the Superintendent, Reader, Group-B (Non-Gazetted), Senior Clerk, Library Assistant, Group-C, in the State Board of Literature and Culture under the administrative control of the Marathi Language Department (Recruitment) Rules, 2016.

2. In these rules, unless the context requires, otherwise,-

(*a*) "Board" means the State Board of Literature and Culture under the administrative control of the Marathi Language Department;

(*b*) "degree" means a degree of a statutory University;

(*c*) "Department" means the Marathi Language Department of the Government;

(*d*) "diploma" means a diploma of a statutory University;

(*e*) "Higher Secondary School Certificate Examination" means the Higher Secondary School Certificate Examination conducted by a Divisional Board established under the Maharashtra Secondary and Higher Secondary Education

Boards Act, 1965 (Mah. XLI of 1965) and includes any other examination declared by the Government to be equivalent thereto;

(*f*) "Government" means the Government of Maharashtra;

(*g*) "Masters' degree" means a Masters' degree of a statutory University.

3. Appointment to the post of Superintendent, in the Board shall be made either,-

*(a)* by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Senior Clerk in the Board having not less than three years regular service in that post and possessing the qualification mentioned in sub-clause *(ii)* of sub-rule *(c)*;

or

*(b)* by transfer on deputation of a suitable person holding equivalent post in any office of the Government and having minimum three years administrative experience and possessing the qualification mentioned in sub-clause *(ii)* of sub-rule *(c)*;

or

*(c)* by nomination from amongst the following candidates who ,-

*(i)* are not more than thirty-eight years of age:

Provided that, the upper age limit shall be relaxed up to five years in case of candidates already in the Government Service;

*(ii)* possess a degree in Marathi:

Provided that, preference shall be given to a candidate possessing Masters' degree in Marathi;

*(iii)* possess experience for a period of two years in Government or Public Sector Organisation or Institution in a subordinate post gained after acquiring the qualifications mentioned in sub-clause *(ii)*.

4. Appointment to the post of Reader in the Board shall be made either,-

*(a)* by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Senior Clerk in the Board having not less than three years regular service in that post and possessing qualification mentioned in sub-clause *(ii)* of sub-rule *(c)*;

or

*(b)* by transfer on deputation of a suitable person from Government Offices who possess qualification and experience mentioned in sub-clauses *(ii)* and *(iii)* of clause *(c);*

or

*(c)* by nomination from amongst the following candidates who, -

*(i)* are not more than thirty- eight years of age:

Provided that, the upper age limit shall be relaxed up to five years in case of candidates already in the Government Service;

*(ii)* possess a Masters' degree in Marathi or Sanskrit;

*(iii)* possess minimum 2 years practical experience of editorial or research work or both in Marathi, on different subjects coming under the various branches of study and knowledge.

5. Appointment to the post of Senior Clerk, in the Board shall be made either,-

*(a)* by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Clerk-cum-Typist in the Board, having not less than three years regular service in that post;

or

*(b)* by transfer on deputation of a suitable person holding an equivalent post in any office of the Government*;*

or

*(c)* by nomination from amongst the following candidates who,-

*(i)* are not more than thirty-eight years of age:

Provided that, the upper age limit shall be relaxed up to five years in case of candidates already in the Government Service;

*(ii)* possess degree in Marathi:

Provided that, preference shall be given to a candidate having administrative experience.

6. Appointment to the post of Library Assistant, in the Board shall be made-

*(a)* by nomination from amongst the following candidates who,-

*(i)* are not more than thirty-eight years of age:

Provided that, the upper age limit shall be relaxed up to five years in case of candidates already in the Government Service;

*(ii)* have passed Higher Secondary School Certificate Examination:

Provided that, preference shall be given to a candidate possessing degree in Marathi;

*(iii)* possess a diploma or degree in Library science.

7. Appointment to the posts mentioned in rules 3 and 4 shall preferably be made by promotion. If suitable and eligible persons are not available for promotion then appointment shall be made by nomination.

8. Appointment to the post mentioned in rule 5 shall be made by promotion and nomination, in the ratio of 50:50, respectively.

9. A person appointed to the post mentioned in rules 3, 4, 5 and 6 shall be required to complete successfully the training prescribed by the Government, from time to time.

10. A person appointed to the post mentioned in rules 3, 4, 5 and 6, shall be required to pass examination in Marathi and Hindi languages according to the rules made in that behalf, unless he / she has already passed or has been exempted from passing the said examination.

11. A person appointed to the post mentioned in rules 3, 4, 5 and 6 should possess a certificate in Computer Operation prescribed by the Directorate of Information Technology, Government of Maharashtra, from time to time.

By order and in the name of the
Governor of Maharashtra,

Aparna
Arvind
Gawde

Digitally signed by
Aparna Arvind
Gawde
Date: 2016.05.13
17:27:48 +05'30'

(Aparna A. Gawde)
Deputy Secretary to Government.